**मराठी विश्वकोश परिचय ग्रंथ, परिभाषा कोश आणि मराठी विश्वकोशाचे १ ते २० खंड कार्ड पेनड्राईव्हवर उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**मराठी भाषा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- विनिमं-२०१७/प्र.क्र.१३/भाषा-२,**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०१७

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळामार्फत १ ते २० खंड प्रकाशित करण्यात आले असून विश्वकोशाचे १ ते १७ खंड सीडी स्वरूपात उपलब्ध करून देण्यात आले आहेत. विश्वकोशाच्या एकूण १८००० नोंदी करण्यात आल्या आहेत. सद्यस्थितीत सदर साहित्य संकेतस्थळावर उपलब्ध असले तरी ग्रामीण ठिकाणी इंटरनेट अभावी वाचकांपर्यंत पोहचत नाही. तंत्रज्ञानातील बदलामुळे सीडीची जागा पेनड्राईव्हने घेतलेली असल्याने वाचकांसाठी पेनड्राईव्ह वापरणे सोयीचे आहे. ग्रंथाली ही प्रकाशन संस्था ग्रंथ प्रसार, समाजात वाचनाची आवड आणि पुस्तकांची आवड जोपासली जावी म्हणून कार्यरत असलेली एक अनुभवी विश्वस्त संस्था आहे. नवीन तंत्रज्ञानाचा वापर करणा-या सदर संस्थेच्या सहकार्याने मराठी विश्वकोश परिचय ग्रंथ, परिभाषा कोश आणि मराठी विश्वकोशाचे १ ते २० खंड एकत्रितपणे क्रेडिट कार्ड पेनड्राईव्हवर वाचकांना उपलब्ध करून देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

मराठी विश्वकोश परिचय ग्रंथ, परिभाषा कोश आणि मराठी विश्वकोशाचे १ ते २० खंड एकत्रितपणे कार्ड पेनड्राईव्हवर ग्रंथाली या प्रकाशन संस्थेमार्फत उपलब्ध करून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. वाचकांसाठी सदर पेनड्राईव्ह वाजवी दरात उपलब्ध होईल अशा त-हेने महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ आणि ग्रंथाली प्रकाशन संस्थेने दर निश्चित करावेत. या कामासाठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांनी ग्रंथालीसोबत १ वर्षासाठी करार करावा. सदर करारामध्ये खालील बाबी समाविष्ट असतील-

१) पेनड्राईव्हमध्ये वाचकांच्यादृष्टीने उपयुक्त अशा अनेक अद्ययावत सेवा - सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी कार्ड पेनड्राईव्हमध्ये समाविष्ट केलेली माहिती सुरक्षित (Data copy protect) करण्याची दक्षता सदर संस्थेने घ्यावी.

२) ग्रंथाली या संस्थेने पेनड्राईव्ह विकत घेणा-या ग्राहकांना वेळोवेळी तांत्रिकदृष्ट्या अद्ययावत केलेले खंड उपलब्ध करून देण्यात यावेत.

३) ग्रंथाली या संस्थेमार्फत करारपत्रात निश्चीत केल्यानुसार स्वामित्वधनाची रक्कम मंडळास अदा करण्यात यावी. स्वामित्वधनापोटी जमा रक्कम विश्वकोश निर्मिती मंडळाने शासनाच्या जमा लेखाशिर्षात जमा करावी. सदर लेखाशिर्षाचे तपशिल स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

४) वरील अटींबरोबर अन्य अटी/शर्ती करारात समाविष्ट करण्याचे अधिकार सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांना राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२७१४०७०७०६३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Nanda Maruti Raut
Date: 2017.02.27 15:10:40 +05'30'

**( नंदा राऊत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा. मुख्यसचिव/ अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
५) मा.मंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्य अधिकारी
६) प्रबंधक उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई (पत्राने)
७) प्रबंधक उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने)
८) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, विधानभवन, मुंबई
९) लोकायुक्त/उप लोकायुक्त, मुंबई (पत्राने)
१०) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
११) महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४) सर्व मंत्रालयीन विभाग
१५) भाषा संचालक, भाषा संचालनालय, वांद्रे (पूर्व), मुंबई
१६) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई
१७) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई
१८) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई
१९) निवड नस्ती (भाषा-२).

सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, सदर शासन निर्णय त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील अधिकारी/कर्मचारी यांच्या निदर्शनास आणावे.